शासकीय परिचर्या प्रशिक्षण विद्यालयातील ANM व GNM प्रशिक्षण पूर्ण करण्यात आलेल्या परिचर्याकडून बंधपत्र घेण्याचे बंद करण्यात येऊन बंधपत्रित आरोग्य सेविका/बंधपत्रित अधिपरिचारका असे संबोधनही रद्द करण्यात आल्याबाबत.

# महाराष्ट्र शासन

## सार्वजनिक आरोग्य विभाग

शासन परिपत्रक क्रमांकः संकीर्ण-२०२२/प्र.क्र ३५२/सेवा-५
नवीन मंत्रालय, १० वा मजला, संकुल इमारत
गोकूळदास तेजपाल रूग्णालय आवार, मुंबई-०१
दिनांक : १९ एप्रिल,२०२२.

**वाचा : -**

१. शासन निर्णय क्रमांक सेप्रनि-२०१९/प्र.क्र ११८/सेवा ५, दि. २८.०६.२०१९.
२. शासन निर्णय क्रमांक बंधप-२०२०/प्र.क्र २०२/सेवा ५, दि.२९.०४.२०२० व दि. २४.०८.२०२०.
३. शासन आदेश क्र. सेप्रनि-२०१९/प्र.क्र ११८/सेवा ५, दि. ११.०१.२०२२.

**प्रस्तावना :-**

सार्वजनिक आरोग्य विभागाच्या अधिपत्याखालील परिचर्या विद्यालयातून ANM (Auxiliary Nurse Midwifery) व GNM (General Nursing and Midwifery) चे प्रशिक्षण देण्यात येते. या प्रशिक्षण केंद्रात प्रवेश घेणाऱ्या प्रशिक्षणार्थींना शासनाकडून मोफत प्रशिक्षण देण्यात येत होते. या प्रशिक्षण कालावधीत संबंधित प्रशिक्षणार्थींनी प्रशिक्षण अर्धवट सोडून जावू नये व शासनास आवश्यकता भासल्यास किमान कालावधीची सेवा शासकीय आरोग्य संस्थेत देणे बंधनकारक असल्याने शासकीय परीचर्या महाविद्यालयातील ANM व GNM प्रशिक्षणार्थींकडून संबंधित प्रशिक्षणार्थी यांचे नावे असलेले रु. २५००/- इतक्या रक्कमेचे National Saving Certificate व प्रशिक्षण कालावधीतील अटी व शर्तींचे बंधपत्र लिहून घेण्यात येत होते. सदर अभ्यासक्रम उत्तीर्ण झालेल्या प्रशिक्षणार्थींनी महाराष्ट्र नर्सिंग कॉन्सिलकडे नोंदणी झाल्यानंतर शासनास आवश्यकता भासल्यास संबंधित परिचारीकेने ३ ते २४ महिने इतक्या कालावधीपर्यंत शासनास सेवा देणे अभिप्रेत होते. सदर बंधपत्र म्हणजे शासकीय सेवेची हमी नव्हती. अशा ANM अभ्यासक्रम पूर्ण केलेल्या परीचर्या या संबंधीत जिल्हा परिषदेच्या अधिपत्याखालील प्राथमिक आरोग्य केंद्र/ उपकेंद्रात आरोग्य सेविका व जीएनएम अभ्यासक्रम पूर्ण

केलेल्या परीचर्या या सार्वजनिक आरोग्य विभागाच्या अधिपत्याखालील आरोग्य सेवा देणाऱ्या रुग्णालयांमध्ये अधिपरिचारीका म्हणून सेवा देत होत्या. या प्रकारच्या अधिपरिचारीकांना बंधपत्रित अधिपरिचारीका असे संबोधण्यात येत होते.

२. सर्जन जनरलच्या काळापासून अशाप्रकारे बंधपत्रित परीचर्यांना १८ महिने ते २४ महिने इतक्या बंधपत्र कालावधी पूर्ण केल्यानंतर अस्थायी रिक्त पदांवर नियुक्ती देण्यात येत होती. या काळात त्यांना नियमित वेतनही दिले जात होते. पूढे याच बंधपत्रित अधिपरिचारीकांच्या सेवांचे कार्यमुल्यमापन करुन नियुक्ती प्राधिकाऱ्यांकडून त्यांच्या सेवा नियमित करण्यात येत होत्या.

३. तथापि, सामान्य प्रशासन विभागाच्या शासन परिपत्रक साप्रवि, दि. २५.०८.२००५ मध्ये नमूद केल्यानुसार मा. सर्वोच्च न्यायालयाने तात्पुरत्या /अस्थायी नियुक्त्या नियमित न करता शासन सेवेत सेवा नियमित करण्यासाठी विहित कार्यपध्दतीने शासन सेवेत प्रविष्ठ होणे बंधनकारक केल्याने विनाखंड शासनसेवेत कार्यरत असलेल्या बंधपत्रित अधिपरिचारीकांचे सेवानियमित करण्यासाठी अडचणी निर्माण झाल्याने अधिपरिचारीका संवर्गाच्या सेवाप्रवेश नियमामध्ये दि.१५.०४.२०१५ च्या अधिसूचनेनूसार बंधपत्रित अधिपरिचारीकांच्या सेवा नियमनासाठी विशेष लेखी परीक्षा घेऊन त्यांच्या सेवा नियमित करण्याचे प्रावधान सेवाप्रवेश नियमात करण्यात आले होते. सेवाप्रवेश नियमातील तरतूदीनुसार विशेष लेखी परीक्षा घेवून अधिसूचनेच्या दिनांकापर्यंतच्या म्हणजेच दि.१५.०४.२०१५ पर्यंत अखंडीतपणे शासनसेवेत कार्यरत असलेल्या बंधपत्रित अधिपरिचारीकांचे सेवानियमन करण्यात आले आहे. सदर अधिसूचना दि.२७.०२.२०२१ च्या अधिसूचनेनूसार रद्दबातल करण्यात आली आहे. सार्वजनिक आरोग्य विभागाच्या दि.१५.०४.२०१५ ची अधिसूचना ही सार्वजनिक आरोग्य विभागातील अधिपरिचारीकांच्या सेवाप्रवेश नियमाची अधिसूचना होती. या अधिसूचनेच्या आधारे ग्रामविकास विभागातील आरोग्य सेविकांना अद्यापही बंधपत्रित आरोग्य सेविका असे संबोधित करुन सेवानियमन किंवा बंधपत्रित आरोग्य सेविका अशा प्रकारच्या नियुक्त्या दिल्या जात असल्याची बाब निदर्शनास आलेली आहे. या अनुषंगाने सविस्तर मार्गदर्शक सूचना या परिपत्रकाद्वारे प्रसिध्द करण्यात येत आहे.

**शासन परिपत्रक:-**

वाचा अ.क्र. १ येथील शासननिर्णयानुसार शैक्षणिक वर्ष २०१९-२०२० पासून शासकिय परिचारीका प्रशिक्षण केंद्रातील सर्व प्रशिक्षणार्थी यांचे बंधपत्र घेणे बंद करण्यात आले आहे. त्यामुळे या शैक्षणिक वर्षापासून कोणतीही ANM व GNM प्रशिक्षणार्थी बंधपत्रित नाही. तसेच, बंधपत्रित म्हणून कार्यरत असलेल्या सर्व परीचर्यांना सहा-सहा महिन्यांची तात्पूरत्या स्वरुपात नियुक्ती देण्याचा शासन निर्णय निर्गमित करण्यात आला आहे.

२. वाचा अ.क्र.२ येथील शासन निर्णयानुसार शासकीय परिचारीका प्रशिक्षण केंद्रातील सर्व प्रशिक्षणार्थी यांचे बंधपत्र घेणे बंद झाले व बंधपत्रित नियुक्ती ही केवळ मर्यादित स्वरुपाची असल्याने व बंधपत्रित परिचारीकांना कंत्राटी स्वरुपात सहा -सहा महिन्यांच्या कालावधीच्या नियुक्त्या देण्याचे निश्चीत झाल्याने प्रथम बंधपत्र झाल्यानंतर पुन:श्च बंधपत्रित म्हणून संबोधित करुन नियुक्त्या न देण्याचे तसेच बंधपत्र हे संबोधनही रद्द झाल्याचे शासन निर्णय निर्गमित करण्यात आले आहे. या अनुषंगाने मा. विधानसभा अध्यक्ष यांनी देखील बंधपत्रित संबोधन बंद करण्याचे निर्देश दिनांक ०९.०६.२०२० च्या बैठकीमध्ये दिलेले आहेत व त्याअनुषंगाने उपरोल्लेखीत शासन निर्णय विभागाने निर्गमित केलेला आहे. यास्तव शासकीय परीचर्या विद्यालयातील ANM व GNM प्रशिणार्थी बंधपत्रित आरोग्य सेविका किंवा अधिपरिचारीका म्हणून संबोधल्या जाणार नाहीत. यापूर्वी बंधपत्रित म्हणून सेवा दिलेल्या आरोग्य सेविका किंवा अधिपरिचारीका यांना पहिले बंधपत्र पूर्ण झाल्यानंतर त्यांना कंत्राटी तत्वावर कार्यरत आरोग्य सेविका किंवा अधिपरिचारीका म्हणूनच संबोधले जाईल.

३. तसेच वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.संकिर्ण-२०१९/प्रक्र २२/कोषाप्रशा-४, दि.२९.०१.२०२० नुसार बंधपत्रित स्वरुपात देण्यात आलेल्या कर्मचाऱ्यांचे वेतनउद्दीष्टातून आहरण बंद करुन या कर्मचाऱ्यांचे पारीश्रामिक कंत्राटी सेवा या उद्दीष्टाखाली आहरण करण्याचे निर्देशित केल्याने विभागाने शासन निर्णय क्र.बंधप-२०२०/प्र.क्र.२०२/सेवा-५, दि.२९.०४.२०२० नुसार सर्व नियमित अधिपरिचारीकांशिवाय इतर (बंधपत्रित सह) सर्व कंत्राटी अधिपरिचारीकांचे ठोक मासिक मानधन रु. २५,०००/- इतके केले आहे.

४. उपरोक्त बाबी लक्षात घेता शासकीय परिचर्या प्रशिक्षण केंद्रातून प्रशिक्षण घेतलेल्या कोणत्याही ANM किंवा GNM परिचर्या आता बंधपत्रित म्हणून राहणार नाहीत. बंधपत्र हे संबोधनही रद्द झाले आहे. नियमित वेतनश्रेणीतील परिचर्या व्यतीरिक्त इतर परिचारीका या केवळ कंत्राटी परिचर्या आहेत. त्यांना ठोक मानधन देण्यात येते. त्यामुळे त्यांना कोणतीही वेतनश्रेणी अनुज्ञेय राहणार नाही.

५. तसेच दि.१५.०४.२०१५ ची अधिसूचना ही फक्त सार्वजनिक आरोग्य विभागातील अधिपरिचारीका संवर्गासाठी सेवाप्रवेश नियमाची अधिसूचना होती. सदर अधिसूचना आरोग्य सेविका या संवर्गासाठी नव्हती. ग्रामविकास विभागाने आरोग्य सेविका पदाचे सेवाप्रवेश नियमांत दि.१५.०४.२०१५ प्रमाणे विशेष लेखी परिक्षेची तरतूद केली असल्यास त्यास सार्वजनिक आरोग्य विभागाची सहमती घेण्यात आलेली नाही.

६. जिल्हा परिषदेच्या अधिपत्याखालील परंतु आरोग्य विभागाशी निगडीत कार्यरत तांत्रिक संवर्गातील (उदा. आरोग्य सेवक, आरोग्य सेविका, प्रयोगशाळा तंत्रज्ञ, औषध निर्माता इ.) कर्मचाऱ्यांच्या

वेतनासाठी आरोग्य विभागासाठी अर्थसंकल्पीत झालेल्या निधीतून जिल्हा परिषदेला अनुदान देण्यात येते. तसेच या संवर्गांचे सेवाप्रवेश नियम जरी ग्रामविकास विभागाकडून अधिसूचित करण्यात येत असले तरी, या सेवाप्रवेश नियमांना सार्वजनिक आरोग्य विभागाची सहमती घेणे आवश्यक असते. या बाबी लक्षात घेता आरोग्य सेविका हा संवर्ग शुश्रुषा संवर्गाच्या अंतर्गत येत आहे. तसेच ANM प्रशिक्षण देणारे सर्व शासकीय परिचर्या विद्यालये हे सार्वजनिक आरोग्य विभागाच्या अधिपत्याखाली आहेत. या परिचर्या विद्यालयातील प्रवेश प्रक्रिया तसेच प्रशिक्षणांर्थीकडून बंधपत्रही फक्त परिचर्या विद्यालय स्तरावरच घेतले जात होते. सबब, सार्वजनिक आरोग्य विभागाने सर्व ANM व GNM प्रशिक्षणार्थींकडून बंधपत्र घेण्याचे बंद केल्याने व बंधपत्रित संबोधनही रद्द केल्याने सार्वजनिक आरोग्य विभागातील कोणत्याही अधिपरिचारीका तसेच, ग्राम विकास विभागाच्या अंतर्गत कार्यरत असणाऱ्या आरोग्य सेविका या बंधपत्रित अधिपरिचारीका नाहीत तसेच या परिचर्यांना बंधपत्रित अधिपरिचारीका किंवा बंधपत्रित आरोग्य सेविका असे संबोधण्यात येऊ नये. तसेच, अशा अधिपरिचारीकांची नियुक्ती केवळ कंत्राटी स्वरुपात एकावेळी कमाल ६ महिन्याच्या मर्यादेतच करण्यात यावी.या मार्गदर्शक सुचनेचे तंतोतंत पालन करण्यात यावे. सदर मार्गदर्शक सूचनांचे उल्लंघन करणारे अधिकारी/कर्मचारी शिस्तभंग विषयक कारवाईस पात्र राहतील.

७. मा.सर्वोच्च न्यायालयाच्या न्यायनिर्णयानुसार नियमित शासन सेवेतील नियुक्ती ही विहित कार्यपध्दतीने याचाच अर्थ सांविधानिक पध्दतीने विहित सेवाप्रवेश नियमानुसारच होणे आवश्यक आहे. ही बाब सर्व संबंधितांच्या तसेच नियुक्ती प्राधिकाऱ्यांच्या निदर्शनास या परिपत्रकाद्वारे पुनःश्च आणण्यात येत आहे.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०४१३१६२७०२९६१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

ARCHANA VILAS WALZADE

Digitally signed by ARCHANA VILAS WALZADE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC HEALTH DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=b17094004b015083dae757656e5d24847898197ddd6b0366a9177f097ed0887a, pseudonym=EFE0AAA7FB78AD706283B7A34C5FC48C1920AEBD, serialNumber=B4E19876AB3EEC36E3A3B988441648AB87470CDFE66B14CFBE7AC9BD770485C1, cn=ARCHANA VILAS WALZADE
Date: 2022.04.19 17:27:12 +05'30'

**( अर्चना वालझाडे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. अपर मुख्य सचिव, ग्रामविकास व पंचायत राज विभाग, मंत्रालय.

२. आयुक्त तथा अभियान संचालक राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई
३. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
४. संचालक आरोग्य सेवा मुंबई/पुणे.
५. सहसंचालक आरोग्य सेवा (सर्व).
६. महालेखापाल १ /२, महाराष्ट्र ( लेखा व लेखापरिक्षा ) / लेखा व अनुज्ञेयता, मुंबई/ नागपूर.
७. सहसंचालक, आरोग्य सेवा ( अर्थ व प्रशासन ), पुणे.
८. सहसंचालक आरोग्य सेवा , प्राथमिक आरोग्य केंद्र /उपकेंद्रे.
९. उपसंचालक आरोग्य सेवा (शुश्रूषा), मुंबई.
१०.उपसंचालक, आरोग्य सेवा, परिमंडळ (सर्व).
११.जिल्हा कोषागार अधिकारी,(सर्व)
१२.जिल्हा शल्य चिकित्सक, जिल्हा रूग्णालय, (सर्व)
१३.जिल्हा आरोग्य अधिकारी (सर्व)
१४.तालुका आरोग्य अधिकारी(सर्व).
१५.प्राचार्य परिचर्या प्रशिक्षण विद्यालय (सर्व) (यांनी सर्व प्रशिक्षणार्थींच्या निदर्शनास सदर परिपत्रक आणावे)
१६.निवडनस्ती( सेवा-५ )